अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१५/प्र.क्र.४३८/१५/तांशि -७
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २७ ऑक्टोबर, २०१६

संदर्भ : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि.८ मे, २०१५.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५ (२)(१९३)/१२२४२/सात-अ, दि. ११ डिसेंबर,२०१५ चे पत्र.
३) संचालक तंत्रशिक्षण संचालनालय महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.४अ/ आस्था/ २०१६/ ४०६, दि.२१ मार्च, २०१६ चे पत्र.
४) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.२६ जुलै,२०१६

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दि.११ डिसेंबर,२०१५ च्या पत्राद्वारे एकूण ५१ उमेदवारांची अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर शिफारस केलेली आहे. त्यापैकी महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत एकूण ५० उमेदवारांना संदर्भाधीन दि.२६ जुलै, २०१६ चा शासन निर्णयाद्वारे नियुक्ती देण्यात आलेली आहे. तरी आता उर्वरीत ०१ महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांस त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ०६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे. सदर पदस्थापना महसूली विभाग वाटप नियम,२०१५ नुसार करण्यात आलेली आहे.

| गुण. क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | दि.०८/०५/२०१५ अन्वये वाटप केलेला महसुली विभाग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १० | श्री. अमोल शशिकांतराव कुलकर्णी | खुला | खुला | अमरावती | शासकीय तंत्रनिकेतन, मूर्तीजापूर | ------- |

०२. उपरोक्त उमेदवारास वैदयकीय मंडळाने वैदयकीय दृष्टया शासकीय सेवेत पात्र ठरविले आहे तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

०३. उपरोक्त उमेदवाराचा चारित्र्य पडताळणी अहवाल व साक्षांकन नमुना पोलीसांकडून प्राप्त झाला असून त्यांच्या विरूद्द कोणताही दंड व शिक्षा असलेबाबतची नोंद आढळून येत नसल्याचे कळविले आहे.

०४. उक्त उमेदवाराची अधिव्याख्याता, संगणक अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/ (३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

७) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्य सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील...

९) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१०) उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

११) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०५. प्रस्तुत पदाकरीता आवश्यक असलेल्या शैक्षणिक अर्हतेच्या तरतूदीनुसार उमेदवाराने पदवीस्तरावर किमान प्रथम श्रेणी धारण करणे आवश्यक आहे. तथापी, UGC व AICTE च्या धोरणानुसार काही विद्यापिठे / स्वायत्त संस्थाकडून उमेदवारांना Class ऐवजी Grade देण्यात येते. अशा उमेदवारांची पदवी सेवा प्रवेश नियमानुसार First Class किंवा Equivalent आहे याची खातरजमा संबंधित संस्था प्रमुखांनी करूनच उमेदवारांना रूजू करून घ्यावे.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्ती नंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१६५८४०२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2016.10.27 17:01:55 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने) (e-mail द्वारे)

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
२. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
७. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन,मुर्तिजापूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत).
१०. निवड नस्ती (तांशि-७).